हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी netaksharee@gmail.com

— संपादक —

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

— अतिथी संपादक —

हर्षल पाटील ( हैदराबाद )

— सहसंपादक —

सोनाली घाटपांडे ( पुणे )

भारती सरमळकर ( मुंबई )

सचिन काकडे ( मुंबई )

ई - साहित्य प्रकाशन

वर्ष : तिसरे , अंक : २

दिनांक : २८.१२.२०१०

## अतिथी संपादकाच्या लेखणीतून..

अगदी कालची गोष्ट आहे.संध्याकाळची वेळ होती,मी मोबाईलवर एक कार रेसिंगचा गेम खेळत होतो.रेस मस्त रंगात आली होती,शेवटच्या टप्प्यात येऊन पोहचली होती.बस्स,शेवटची ४ वळणं..माझ्या कारच्या पुढे एकच कार होती आणि तीही फक्त काकणभर दूर.कधी ती कार पुढे तर कधी माझी कार पण तितक्यात एका वळणावर माझी कार पलटली..धत्त तेरेकी..सगळी मेहनत व्यर्थ.इतक्या वेळेपासून मोठ्या मुश्किलीने कठीण कठीण वळणे चुकवली आणि नेमके ह्या शेवटच्या वळणावर असे व्हावे.नकळत माझा हात वर कोपऱ्यात असलेल्या रि-स्टार्टच्या खुणेवर जाऊन थांबला.मला माहित होते i can do it फक्त एका नव्या सुरुवातीची गरज होती.बऱ्याचदा असे होते ना ? सगळे कसे छान चालू असते पण आपण नकळत काही छोट्या मोठ्या चुका करत जातो आणि नंतर अशी काही परिस्थिती उभी राहते की हा सगळा गुंता समोर येतो आणि वाटते की,यार,असे कसे झाले ? हे सगळे माझ्याच बरोबर का होते ? ह्या सगळयापासून दूर कुठेतरी पळून जावे.

मला आठवते,लहानपणी आम्ही सगळी लहान मुलं वाळूचे बोगदे बनवायचो.खुप मज्जा यायची खेळतांना.बऱ्याचदा बोगदा तयार करतांना अंदाज चुकायचे आणि मध्येच तो बोगदा मोडून जायचा.मग काय,दोन सेकंदांची नाराजी आणि नंतर पुन्हा ती वाळू एकत्र करुन नवीन बोगद्याची सुरुवात.त्या वयात देखील असे कधीच वाटले नाही की संपले सगळे,आता परत मी नाही बनवू शकणार वगैरे.मला वाटते की,आपण जसजसे वयाने मोठे होतो तसतसे आपली अक्कल तर वाढते पण तिला सांभाळायची खुबी कमी कमी होते.आता हेच बघा ना,लहान मुल जेव्हा पहिल्यांदा चालायला शिकतं तेव्हा कित्येकदा धडपडतं पण म्हणून काय ते चालणं सोडतं ? नाही अजिबात नाही.उलट ते हसत,रडत खडत का होईना नव्या जोमाने उठून उभं राहतं आणि चालतं.त्याच्या अनुकरणप्रिय बालबुध्दीला फक्त इतकंच माहित असतं की त्याच्या आजुबाजूचे,त्याच्या सारखे दिसणारे माणसं आपल्या २ पायांवर चालताहेत ना मग मी देखील चालू शकतो.

आजकाल टिव्ही,वर्तमानपत्रात दररोज एकतरी आत्महत्येची बातमी येते.असे का व्हावे ? कोणाला आपले सुंदर आयुष्य संपवावेसे का वाटावे ? खरंच का त्या व्यक्तीचे प्रॉब्लेम्स इतके कठीण आहेत की,जीवन संपवणे हाच एक उपाय त्या व्यक्तीकडे शिल्लक उरतो ?ह्या सगळया प्रश्नांचे उत्तर एकच..नाही..खरंतर अनेकदा कारणं क्षुल्लक असतात,कुणी परीक्षेत नापास झालेले तर कुणाला प्रेमात अपयश आलेले.अशावेळेस ही लोकं आपल्या बालपणाला पार विसरलेली असतात.अरे,जर ह्या लोकांनी पहिल्यांदा चालण्यात अपयश आले म्हणून हार मानली असती तर ती कधी चालू शकली असती का ? त्यासमोर ही शैक्षणिक परीक्षा,एकतर्फी प्रेम तर काहीच नाही.दिवसभरात अनेक लहान सहान अडीअडचणींना आपण सामोरे जातो पण कधी त्यांचा अतिरेक झाला की आपले मन कच खाऊ लागते,लढायची उमेद नाहीशी होते.तेव्हा मग वाटते की ह्या सगळयापासून पळून जावे,सारे संपून टाकावे.आणि नेमकी हीच चूक आपण करतो.अशा वेळेसच संयमाने विचार केला तर समजेल की ह्या साऱ्या गोष्टी कित्ती छोट्या आहेत.आपल्या आयुष्याच्या २०-३० वर्षांच्या कालावधीत ह्या गोष्टींचे काही अस्तित्व सुध्दा नसते.कालांतराने त्या गोष्टी आपोआप पुसट होणाऱ्या असतात आणि नंतर तर कदाचित त्यांची आठवण देखील आपल्यास होणार नसते पण इथेच शेवट झालाय असा पडदा आपण स्वतःसमोर उभा करतो आणि पुढची नवी सुरुवात,नवा प्रवास आपल्याला दिसतच नाही.

मला तर पुनःसुरुवातीची प्रेरणा नेहमी निसर्गाकडून,आसपास घडणाऱ्या घटनांतून मिळत असते.निसर्ग तर खुप काही शिकवतो.ग्रीष्मात होरपळून निघाल्यावर वर्षाऋतू एक नवीन सुरुवात घेऊन येतो.अमावस्येला मावळलेला चंद्रमा प्रतिपदेस पुन्हा एकदा नव्याने कलेकलेने उगवायला सुरुवात करतो.इथे मला माझ्या एका गझलेतला शेर सांगावासा वाटतो..

उजाडेल सूर्य उद्याही,हे खेळ असे क्षणाचे..पुसून कोरी पाटी,शिकवून सांज गेली..

लोकांना रिस्टार्ट करायचे समजते पण करणे अवघड जाते.कारण ते आधीच्या गोष्टी पुसू शकत नाहीत.त्यांना एकच सल्ला..आमच्या सॉफ्टवेअरच्या दुनियेत सुध्दा रिस्टार्टची सोप्पी युक्ती आहे.आम्ही प्रोग्रॅम रिस्टार्ट करण्याच्या वेळेस अगोदरच्या गोष्टी पुसून नाही टाकत तर त्यांच्याशी असलेल्या लिंक्स तोडून टाकतो आणि नंतर सुरु होणारा प्रोग्रॅम आपोआप त्याजागी आपली माहिती नोंदवून अगोदरच्या गोष्टी ओव्हरराईट करतो.

आपल्यास सुध्दा अगदी हेच करायचेय.जुन्या गोष्टींना आपण विसरले नाही तरी चालेल किंवा जरी आपण त्या विसरु शकत नाहीत तरी पण त्यांच्या लिंक्स तोडून टाका.तुमची नवी सुरुवात बरोब्बर त्या गोष्टींची आठवण पुसायला तुम्हाला मदत करेल.

जागतिक सायकल रेस कॅन्सर झाल्यावरही जिंकणारा लांस आर्मस्ट्रॉंग असो किंवा २००७ च्या विश्वचषकात मानहानीकारक पराभवाचा सामना करुनही पुन्हा नव्या जोमाने खेळास सुरुवात करुन एकदिवसीय क्रिकेट सामन्यात सर्वप्रथम द्विशतक झळकवणारा सचिन तेंडुलकर असो.दोघांनी रिस्टार्ट केलीय.अशी कित्येक उदाहरणे आपल्यासमोर आहेत.आपल्या प्रगल्भ मराठी साहित्यात देखील ज्ञानेश्वर,तुकारामांपासून कवी ग्रेस,कुसुमाग्रज ह्यांनी आपल्या काव्यातून पुनःसुरुवातीचे महत्व पटवून दिलेय.कुसुमाग्रजांनी त्यांच्या ‘कणा’ ह्या कवितेतील नायकाच्या तोंडून एक सुंदर विचार मांडलाय..

मोडून पडलाय संसार तरी मोडला नाही कणा
सर,पाठीवरती हात ठेवून नुसते ‘लढ’म्हणा..

नेटाक्षरीच्या ह्या अंकाद्वारे देखील आम्ही तुमच्या पर्यंत अशाच काही रिस्टार्टचे महत्व सांगणाऱ्या कविता घेऊन आलो आहोत.आम्हाला विश्वास आहे की,सरत्या वर्षातील हा समारोप अंक तुम्हाला नक्कीच आवडेल व नूतन वर्षासाठी पुनःसुरुवातीची प्रेरणा देईल.

## - अतिथी संपादकाची ओळख -

मी हर्षल पाटील ( मेघराज ) (I.I.T. Madras) मधून Computer Science and Engineering (B.Tech and M.Tech.) चे शिक्षण घेऊन सध्या हैदराबादमध्ये Microsoft कंपनीत Software Design Engineer म्हणून काम करतोय.माझ्या काव्य लेखनाला २००५ मध्ये तशी नकळतच सुरुवात झाली,त्यानंतर ऑर्कुटवरील कवितांच्या कम्युनिटीमुळे ही आवड जोपासली गेली आणि भरभराटीला देखील आली.मी ठरवून असे कधीच काही लिहले नाही,मनात ज्या भावना होत्या त्या फक्त कागदावर मांडत गेलो.आणि माझ्या ब्लॉगवर मिळणाऱ्या वाचकांच्या प्रोत्साहनामुळे कविता बहरत गेली.आता लवकरच,मी माझ्या मराठी कवितांचा सुरेश वाडकर,आनंदी जोशी,मुग्धा वैशंपायन आणि अभिषेक मारोटकरच्या आवाजात श्रीरंग उर्हेकरने संगीतबध्द केलेला ‘स्वप्न-ऋतु’ हा ऑडिओ अल्बम २०११ मध्ये खास तुमच्यासाठी घेऊन येतोय.

मला अतिथी संपादकपदाचा बहुमान दिल्याबद्दल नेटाक्षरी संपादक स्वप्नाचे मनःपूर्वक आभार.आणि,नोकरी धंद्यानिमित्त जगभर विखुरलेल्या मराठी माणसांना मराठी कवितांच्या माध्यमातून एकत्र आणणाऱ्या नेटाक्षरीस माझ्या खुप खुप शुभेच्छा.






....पुनःश्च हरि ओम....

कोण तू कोठली तू ? कुठे कधी सांडलेली
कोणी धरला हात तुझा ? अशी कशी दुभंगलीस तू ?

का तुकडे शरीराचे ? का ह्रदय,मन विखुरलेले ?
का लोटले डोळ्यात तुझ्या पूर आसवांचे ?
अन डोक्यात त्रस्त विचार दाटलेले ?

असू दे सरलेला हात तुझा
असू दे मागचे सर्व सुटलेले
असू दे ओठ निःशब्द शिवलेले

एक हाक मारुन तर बघ , पुन्हा उभी राहून तर बघ
अजूनही सारे संपले नाही

जिथे ढासळलीस तू
जिथे कणा तुटून जीव तुझा निसटलेला
तिथूनच पुढे चालून तर बघ
अंतापासून सुरुवात करुन तर बघ
पुनःश्च हरि ओम करुन तर बघ

- सुधीर,मुंबई






....सुरुवात....

कुणीतरी विचारतं ,येतं ना तुला विणायला ?
मग निर्मित का नाहीस..एक सुरेखसं वस्त्रं
विणीन हो खरंच पण धागाच नाही गवसत

इतक्यात कुणी विचारतं,गातेस ना नाजूक ?
छेडायचेय हो तान पण वाद्य आणू कुठून ?
तोच कानी शब्दं येतात..

करतेस ना कविता?
जरा डोळे उघडून बघ , विषयांना काय तोटा ?

बहुरंगी लडी तुझ्या समोर तर उलगडल्यात
नादब्रम्हच तुझ्यासाठी आसमानातून उतरलंय

कुठलाही धागा काढ , कोणताही सुर छेड
बनेल वस्त्र,स्फुरेल गीत..नुसती एकदा सुरुवात कर

हळूच मन फुलारतं , नेत्री स्वप्नं तरळतं
भावखुळं गीत वेडं कागदावर उतरतं

- प्रभा प्रभुदेसाई,आसाम






....कर निश्चय मनाशी आता....

आला हा सूर्य घेऊनी एक नवीन पहाट
नव्या दिशेने करायची वाटचाल तुला आज
जा तू विसरुनी भूतकाळ सारा
नव्या संधीचा गंध गुंजतोय आसमंतात सारा
सोड त्या चुका भूतकाळात ज्या केल्या
आयुष्य सुंदर हे जगायला का तू विसरला
खंबीर असे मन तुझे,नको डगमगू तू देऊस
काळजीत आहेत जे तुझ्या,नको आज तू दुरावूस

आहे खुप साऱ्या गोष्टी आयुष्यात या अनुभवायला
अन एका वादळातच का लागली नौका बुडायला
आहे पंखांत बळ तुझ्या,घे तू उंच भरारी
टाक हवेला भेदूनी त्या,गुंजू दे तुझी डरकाळी
करीन स्वप्नं पूर्ण सारी,निश्चय मनाशी आज कर
राहा पुन्हा उभा हिंमतीने,लढायला स्वतःला तयार कर
पाहिले आहेत स्वप्नं,तुझ्या घरच्यांनी खुप सारी
आज त्या स्वप्नपूर्तीसाठी कर आयुष्याला सुरुवात खरी

आहे तो देव आज तुझ्या पाठीशी उभा
सदैव तू जिंकत राहावे,कर निश्चय मनाशी आता

- शिरीष सप्रे,डोंबिवली






....सुरुवात....

विसरले आहे कालचे मी सर्व
सुरु नवे पर्व,केले आता

आकांक्षांच्या पंखा दिली नवी दिशा
मनी आता आशा,जिंकण्याची

मार्गात आलेले झेलेन हरणं
पेलेन जिंकणं,स्थितप्रज्ञी

जिवीत ध्येयाची जिद्द आहे उरी
अपयश जरी,झेललेले

एक नवा सूर्य उगवतो आहे
माझ्याकडे पाहे,आशेतून

तेजोमय रुप घेतले ते आत
पसरुनी हात,स्वयंस्फूर्त

- अपेक्षा चौधरी






....उत्तर....

तू मनावर घेणार आहेस
आयुष्यातल्या प्रश्नांना धीराने उत्तर देणार आहेस

अपयश आले तरी आयुष्य संपले नाही
यशाने अजूनही नाही म्हटले नाही
वादळवारा आला तरी तू झेप घेणार आहेस
परिस्थितीला निर्धाराने शह देणार आहेस

तू मनावर घेणार आहेस
आयुष्यातल्या प्रश्नांना धीराने उत्तर देणार आहेस

तुझ्यातली शक्तीच तुला साथ देईल
सारं काही संपलं वाटताच पुन्हा सुरुवात होईल
अंधार गुप्प असला तरी तू तेवणार आहेस
स्वतःवरचा विश्वास कायम ठेवणार आहेस

तू मनावर घेणार आहेस
आयुष्यातल्या प्रश्नांना धीराने उत्तर देणार आहेस

- तुषार जोशी,नागपूर






....एक नवी सुरुवात....

आता नाही थांबायचे
वादळं आली,गेली उजेड सोडून..काही नाही उरले पडले सर्व काही मोडून
झाला होता तो निर्माण एकदा करु आता पुन्हा
सर्व काही सोडून,नियम सर्व मोडून
झाला आता नवा उदय,आता नाही थांबायचे..
हरलो मी माझे आयुष्य हरलो,नका बसू रडत
आयुष्य हरवून बसले जे आहेत ते सडत
जगवा नवी उमेद आता,पुन्हा जगायची..
थेंब ओंजळले अश्रू पाझरले त्याचेच का हे तळे साचले
आता करुया उगम नव्या शिखराचा ते गाठण्याचा
करु निर्माण जिद्द जगता मरेपर्यंत
ना कसली चिंता ना खंत,आता नाही थांबायचे..
बघा त्यांचे ओले डोळे ,थरारते थरथरते हात कंपलेले शरीर
जगवा त्यांच्यात ती जिद्द,तीच उमेद,जिवंत करु ते निर्जीव अस्तित्व
बनूया त्यांची शक्ती,जगवूनी एक आशा..मिळवूया एक नवे अस्तित्व,आता नाही थांबायचे..
बना शक्ती स्वतःची स्वतःच्याच आत्मविश्वासाची
न उरले काही आता सोडूनी ते मागे
उभा राहिलो मी आता एक नव्या वाटेवर
सर्व काही विसरुनी करितो एक नवी सुरुवात
बनवूनी एक नवा मार्ग एक मोकळे आभाळ
ठरवले मी आता..नाही थांबायचे..



- शशांक नवलकर,मुंबई




....खिडकी....

बंद मनाच्या खिडकीवर ह्या फुलपाखरु ते बसून गेले
रंग कुणाचे किती वेगळे , क्षणात हसूनी दाखुन गेले

पडून गेला पाऊस बाहेर ,भिजायाचे राहून गेले
चाहुल नाही ओलाव्याची तरी गंध मातीचा भरुन गेले

विरुन गेले मेघ नभीचे शुभ्र चांदणे पडून गेले
सरता थोडी रात्र आजची स्वप्न उद्याचे बघून गेले

पहाट होता क्षितीजावरती कोण भूपाळी गाऊन गेले
सडा अंगणी प्राजक्ताचा किरण कोवळे पाडून गेले

गत जन्मीचे हेवेदावे आता सगळे भुलून गेले
जशी पालवी नवी फुटावी दवबिंदूंनी सजून गेले

हिशेब चुकला ह्या जगण्याचा सुरुवात नव्याने करुन गेले
दार उघडूनी मग खिडकीचे मुक्त मनाला करुन गेले

- हर्षल पाटील,हैदराबाद






....तू चालत रहा....

तू चालत रहा
कधी सरळ सरळ , कधी वक्र वक्र , पायावर भंवरी चक्र चक्र
कधी सुम सुसाट, कधी बिन बोभाट
कधी लपत छपत , कधी गजबजाट
तू चालत रहा
घाल खडावा घाल रिबॉक , पदयात्रा किंवा मॉर्निंग वॉक
बन मिरवणूक कर करमणूक , चल धक्क्याने वा आपसूक
तू ठरव ध्येय तू दिशा ठरव , तू जवळ लांबचा मार्ग ठरव
चल निघ अता का उशीर अता, घे किक स्टार्ट सुट भन्नाट तू
तू चालत रहा
जग वाट पहातंय सूर्याची तू नम्रपणे सुरुवात तो कर
जो रोल मिळाला उचल गड्या ये स्टेजवरी तू बनठनकर
शिवधनुष्य प्रत्येकाच्या आयुष्याचे असते अलग अलग
तू उचल तुझे बन अग्निबाण प्रत्यंचा ओढून धडक धडक
तू स्वतःच बन मग ब्रम्हबाण घे तुझी आण तोडून प्राण
तू चालत रहा
तू चिल्लर खुर्दा बनू नको,चल महायज्ञ आरंभ तू कर
तू विवेकानंद बन किंवा गांधी शिवाजी वा आंबेडकर
जर व्यापारी बन बिल गेटस खेळामध्ये बन तेंडुलकर
जर कवी लेखक बनणार गड्या नोबेलखाली तडजोड न कर
बघ पक्ष्याच्या डोळयामध्ये तू लक्ष्य बनव अन नेम धरुन
तू चालत रहा



- नाम गुम जायेगा,ठाणे

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ६०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.त्या व्यतिरिक्त संकेतस्थळाला भेट देऊन वाचणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे.हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

— ई साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामुल्य ई साप्ताहिके —

स्वरनेटाक्षरी ऑडिओ अल्बम , बाल नेटाक्षरी , ई श्टाप

— प्रसिध्द झालेली ई बुक्स —

टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,चार क्षण,
तो आणि ती,प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान, ई शाळा ,
तो , मी आणि सिगरेट, मोरया, लोकल गोष्टी , मीरा(अनुवाद),ओथंब,सावळ्या मुलीची गाणी

आमची ई बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी - esahity@gmail.com

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी - netaksharee@gmail.com

प्रिय वाचकहो,
२०११ उंबरठ्यावर येऊन ठेपलंय.नेटाक्षरीचा २०१० सालचा हा समारोप अंक पुनःसुरुवातीचे महत्व सांगणाऱ्या कविता घेऊन आम्ही तुम्हासमोर सादर केला.
कारण,नूतन वर्षात आपल्या थांबलेल्या आयुष्याला एक धमाकेदार,जोशिली सुरुवात व्हावी खास म्हणून.
नवीन वर्षात देखील नेटाक्षरीच्या अशाच सकारात्मक अन सुंदर कवितांच्या माध्यमातून आपली भेट होणार आहे.
चला तर मग, जल्लोषात सामोरे जाऊया २०११ ला..
आणि, २०१० ला प्रेमपूर्वक निरोप देऊन २०११ मध्ये एक नवीन सुरुवात करुया..अहो,ही बेईमान जिंदगी अडथळयांचे कित्तीका व्हायरस निर्माण करुन आपली जीवनरुपी सिस्टीम हँग करु देत..

घाबरता कशाला ? आपल्याकडे Restart चे बटन आहे ना यार.. Hit it..




